वरीष्ठ सहायक उपनियंत्रक (गट-ब)
संवर्गातील पदावर तात्पुरत्या स्वरुपात
पदोन्नती देणे व पदस्थापना करणे.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : सीडीएम २०१८/प्र.क्र.८५/विशा-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/ कार्यासन १२, दिनांक ०१.०८.२०१९

२) संचालक, नागरी संरक्षण संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.नासंसं/कार्या-२/३/प्रक्र ६ खंड प/२०१९/८६९ दि. १०.१०.२०१९

**शासन आदेश -**

संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील सहायक उपनियंत्रक (गट-क) या संवर्गातील खाली नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांना वरीष्ठ सहायक उपनियंत्रक (गट-ब) या संवर्गातील (७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर) एस-१५ रु ४१८००-१३२३०० या वेतनश्रेणीतील पदावर खुल्या (अराखीव) प्रवर्गात तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती व पदस्थापना देण्यात येत आहे:-

| क्र. | नाव | प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.बा.आ.मंगसुळे | खुला (अराखीव) | नागरी सरंक्षण प्रशिक्षण महाविद्यालय, मुंबई येथील रिक्त वरीष्ठ सहायक उपनियंत्रक (गट-ब) पदावर. |
| २ | श्रीमती शो.कि.मेहरोळे | खुला (अराखीव) | उपनियंत्रक, नागरी संरक्षण, क्षेत्र-३, बृहन्मुंबई, मुलुंड, मुंबई येथील वरीष्ठ सहायक उपनियंत्रक (गट-ब) या रिक्त पदावर |
| ३ | श्री.मा.कि.गावडे | खुला (अराखीव) | अतिरिक्त नियंत्रक, नागरी संरक्षण, बृहन्मुंबई कार्यालयातील वरीष्ठ सहायक उपनियंत्रक(गट-ब) या रिक्त पदावर. |
| ४ | श्री. सु.पा. सुर्यवंशी | खुला (अराखीव) | उपनियंत्रक, नागरी संरक्षण क्षेत्र-४, बृहन्मुबई,अंधेरी कार्यालयात वरीष्ठ सहायक उपनियंत्रक(गट-ब), या रिक्त पदावर |

वरील वरीष्ठ सहायक उपनियंत्रक (गट-ब) यांची पदोन्नतीने नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(१) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(२) सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका २८३०६/२०१७ मधील वेळोवेळी होणाऱ्या निर्णयांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(३) पदोन्नत झालेल्या वरिष्ठ सहायक उपनियंत्रक यांनी पदोन्नतीचे / पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ दिवसांच्या आत हजर होणे आवश्यक राहील. त्याप्रमाणे ते हजर झाले नाही तर त्यांना पदोन्नती नको असे समजून शासन निर्णय सा.प्र.वि. क्रमांक एसआरव्ही १०८७/प्रक्र ११३१/प्र क्र ११/८९-कार्यासन १२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांना देण्यात आलेली पदोन्नती रद्द करण्यात येईल.

(४) संचालक, नागरी संरक्षण यांनी पदोन्नत झालेल्या वरिष्ठ सहायक उपनियंत्रकांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी संबंधितांना सूचना द्याव्यात. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

(५) पदोन्नत वरिष्ठ सहायक उपनियंत्रकांनी त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्याचे लक्ष सा.प्र.वि. परिपत्रक क्र सीडीआर १०८२/२५६७/२८/११, दि. ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे.

२. हे शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३९९/२०२० दि.-१०.८.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३ सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२००८२४१३३१४४०४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Ganpatrao Deshmukh

Digitally signed by Prakash Ganpatrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a2023a0ab760cd894a2dbe530b17c6d82f1bdc0c3543072e60d70efe328c9bc2, serialNumber=aa75bd353f4df463119a0887b43c329c3364a4d90afd1a5f153d6604ab536ddb, cn=Prakash Ganpatrao Deshmukh
Date: 2020.08.24 17:17:22 +05'30'

**(प्र. ग. देशमुख)**
सह सचिव, गृह विभाग

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२. संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई.
३. सह सचिव / उप सचिव, समाजिक न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. सह सचिव / उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयात/लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
९. मा.राज्यमंत्री (गृह) शहरे, ग्रामिण यांचे खाजगी सचिव.
१०. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (अ. व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन १२/१६ ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व संबंधित अधिकारी यांना (नागरी संरक्षण संचालनालयामार्फत)
१४. निवड नस्ती, विशा-८.